**महाराष्ट्र शासन**

**क्रमांक:कृषिआ-१२११/प्रक्र-१४३ /१६ए**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास**
**मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय विस्तार**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
दिनांक : १० मे, २०११

विषय : बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ नुसार प्रकरणे सादर करण्यासाठी अधिका-यांचे तीन स्तर निर्धारित करणे बाबत.

संदर्भ: शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२००४/ प्रक्र.१५/०४/१२, दि. २५/०५/२००६

**कार्यालयीन आदेश**

संदर्भाधीन शासन अधिसूचनेद्वारे महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ प्रसारित करण्यात आला आहे. सदर अधिनियमाच्या कलम ९ (१) व (२) अंतर्गत प्रत्येक विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांनी त्यांना दुय्यम अधिका-यास अंतिम निर्णय घेण्यासाठी शक्ती प्रदान करावयाच्या आहेत. तसेच विभागाशी/ कार्यासनाशी संबंधीत सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्यासाठी अधिका-यांचे तीन स्तर निर्धारित करण्याचे निदेश देण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने या कार्यासनाशी संबंधीत विषयाच्या बाबतीत सोबतच्या तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि वरिष्ठ अधिका-यांचे निदेश असल्यास किंवा काही विशिष्ठ अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०११०५१०१११५५००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सुनिल हंजे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक
सह सचिव ( प्रशा-१), कृषि व पदुम विभाग
अवर सचिव (प्रशा-१), कृषि व पदुम विभाग
कृषि व पदुम विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती/का-१६ए

कृषि व पदुम विभाग

कार्यासन-१६ए

(अजराजपत्रित गट-ब, गट-क व गट-ड मधील क्षेत्रीय कर्मचाऱ्यांची आस्थापना)

| **अ.क्र.** | **विषय** | **नस्ती सादर करण्याचे टप्पे** | **अंतिम निर्णय घेण्यास सक्षम अधिकारी** |
|---|---|---|---|
| १ | बदली | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| २ | रजा | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| ३ | पदोन्नती/जन्मतारीख बदलणे, मानीव दिनांक इ. सेवा विषयक बाबींची गाऱ्हाणी | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| ४ | वैद्यकीय देयक (सर्व गट) | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| ५ | अनुकंपा नियुक्ती | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| ६ | सेवा प्रवेश नियम | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| ७ | विलंबितसेवा निवृत्ती लाभांवरील व्याज प्रदान विषयीची प्रकरणे (सर्व गट) | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| ८ | संघटनांच्या विविध मागण्या | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| ९ | वाहन/यंत्र सामुग्री खरेदी व दुरुस्ती | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| १० | जागा भाड्याने घेणे | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| ११ | प्रशासकीय इमारत बांधकाम | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| १२ | पदे पुढे चालू ठेवणे | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| १३ | उपरोक्त विषयांच्या अनुषंगाने उद्‌भवणारी लोकायुक्त प्रकरणे व न्यायालयीन प्रकरणे | क.अ./उ.स./सचिव | सचिव |
| १४ | कार्यालयीन निरीक्षणविषयक बाबी | क.अ./उ.स./सचिव | सचिव |